महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरणाचे अध्यक्ष तसेच सदस्य यांचे भत्ते /सेवाशर्ती सुनिश्चित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृहनिर्माण विभाग
## शासन निर्णय क्रमांकः रेरा-२०१८/प्र.क्र.२०३/दुवपु-२

गृहनिर्माण विभाग, ६ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १३ जून, २०१८

**वाचा :-**

१) स्थावर संपदा (विनियमन व विकास) अधिनियम, २०१६
२) महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरण (अधिकारी व इतर कर्मचारी) (नियुक्ती व सेवाशर्ती) नियम, २०१७ दि.२०.०४.२०१७
३) शासन निर्णय क्रमांकः स्थासंअ-२०१७/प्र.क्र.१२५/दुवपु-२, दि.०८.०५.२०१८

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने स्थावर संपदा (विनियमन व विकास) अधिनियम, २०१६, दि.२६.०३.२०१६ रोजी अधिसूचित करण्यात आला असून तो राज्यात दि.०१.०५.२०१७ पासून अंमलात आला आहे. उपरोक्त अधिनियमातील कलम ४३ मध्ये स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरणाच्या स्थापनेची तरतूद करण्यात आली आहे. तर कलम ४५ ते ४८ मध्ये अपिलीय न्यायाधिकरणाचे अध्यक्ष तसेच सदस्य यांच्या नेमणूकीबाबतची कार्यपध्दती तसेच अटी व शर्ती इत्यादी विहित करण्यात आल्या आहेत. सदर अधिनियमाच्या कलम ४५ नुसार स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरणाची रचना एक अध्यक्ष व दोन पूर्णवेळ सदस्य (१- न्यायिक सदस्य, १- तांत्रिक/ प्रशासकीय सदस्य) अशी असणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे उपरोक्त अधिनियमातील कलम ४६ (१) (अ) मधील तरतूदींनुसार स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरणाची अध्यक्ष हे मा. उच्च न्यायालयाचे कार्यरत अथवा सेवानिवृत्त न्यायाधीश असणे आवश्यक आहे. तसेच कलम ४६(१) (ब) तसेच ४६ (१) (क) मधील तरतूदींन्वये अपिलीय न्यायाधिकरणाचे न्यायिक सदस्य तसेच तांत्रिक /प्रशासकीय सदस्य यांची अर्हता निश्चित करण्यात आली आहे. केंद्रीय स्थावर संपदा अधिनियमातील विहित केलेल्या विविध तरतूदींच्या आधारे वर संदर्भ क्र.३ येथील नमूद केलेल्या दि.०८.०५.२०१८ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरणाचे अध्यक्ष तसेच न्यायिक व तांत्रिक/ प्रशासकीय अशा पुढे नमूद केलेल्या दोन पूर्णवेळ सदस्यांची नियुक्ती करण्यात आलेली आहे. त्याचप्रमाणे केंद्रीय स्थावर संपदा अधिनियम, २०१६ मधील कलम ८४ मधील तरतूदींन्वये महाराष्ट्र स्थावर संपदा अपिल न्यायाधिकरण (अधिकारी व कर्मचारी) (नियुक्ती व सेवाशर्ती) नियम, २०१७ हे दि.२०.०४.२०१७ रोजी अधिसूचित करण्यात आले आहेत. उपरोक्त नियमातील नियम ६ व ५ मध्ये अनुक्रमे विहित केल्यानुसार महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरणाच्या अध्यक्षास उच्च न्यायालयाच्या न्यायाधिशाच्या मासिक वेतनाइतके मासिक वेतन अनुज्ञेय आहे. तर, सदस्यास

राज्य शासनाच्या मुख्य सचिवांच्या वेतनाइतके मासिक वेतन अनुज्ञेय आहे. त्याचप्रमाणे उपरोक्त नियमातील नियम ६ (३) नुसार अपिलीय न्यायाधिकरणाच्या अध्यक्ष व सदस्यांचे इतर भत्ते व सेवाशर्ती या राज्य शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशानुसार असतील असे विहीत करण्यात आले आहे. उपरोक्त पार्श्वभूमीच्या आधारे महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरणाचे अध्यक्ष तसेच पूर्णवेळ न्यायिक व तांत्रिक/ प्रशासकीय अशा दोन सदस्यांना लागू असणारे इतर भत्ते तसेच सेवाशर्ती सुनिश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

स्थावर संपदा (विनियमन व विकास) अधिनियम, २०१६ तसेच महाराष्ट्र स्थावर संपदा अपिल न्यायाधिकरण (अधिकारी व कर्मचारी) (नियुक्ती व सेवाशर्ती) नियम, २०१७, दि.२०.०४.२०१७ मधील तरतूदींचा वापर करुन शासन या द्वारे महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरणाचे अध्यक्ष तसेच सदस्य यांच्या भत्यांबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

<u>अध्यक्ष, महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरण</u>:-

केंद्रीय स्थावर संपदा (विनियमन व विकास) अधिनियम, २०१६ तसेच दि.२०.०४.२०१७ रोजीच्या महाराष्ट्र स्थावर संपदा अपिल न्यायाधिकरण (अधिकारी व कर्मचारी) (नियुक्ती व सेवाशर्ती) नियम, २०१७ मधील तरतूदींनुसार अपिलीय न्यायाधिकरणाच्या अध्यक्षांचा दर्जा हा मा. उच्च न्यायालयाच्या सेवेमध्ये कार्यरत असलेल्या/ सेवानिवृत्त झालेल्या न्यायाधिशांच्या दर्जाच्या समकक्ष आहे. सबब, अध्यक्ष, महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरण यांना पुढीलप्रमाणे भत्ते/ सेवाशर्ती मंजूर करण्यात येत आहेत.

१) <u>वेतन व भत्ते -:</u>

अ) न्यायाधिकरणाच्या अध्यक्षास मा. उच्च न्यायालयाच्या न्यायाधिशाच्या मासिक वेतनाइतके मासिक वेतन देय असेल,

आ) मा. उच्च न्यायालयाच्या न्यायाधिशांना अनुज्ञेय असतील त्या दराने महागाई भत्ता व शहर पूरक भत्ता देय असेल.

इ) त्याचप्रमाणे मा. उच्च न्यायालयाच्या न्यायाधिशांना अनुज्ञेय असतील त्या दराने प्रवास भत्ता, दैनिक भत्ता तसेच इतर भत्ते देय असतील.

२) <u>निवास व्यवस्था:-</u>

मा. उच्च न्यायालयाच्या न्यायाधिशांना अनुज्ञेय असेल, त्याच्या समकक्ष निवासस्थान अपिलीय न्यायाधिकरणाच्या अध्यक्षास अनुज्ञेय असेल. विवक्षित प्रकरणी अध्यक्ष स्वत:च्या मालकीच्या अथवा भाड्याचे निवासस्थानामध्ये वास्तव्य करीत असल्यास प्रचलीत नियमानुसार रकमेची प्रतिपूर्ती केली जाईल,

३) <u>वाहन सुविधा:-</u>

मा. उच्च न्यायालयाच्या न्यायाधिशांना अनुज्ञेय असेल त्याप्रमाणे वाहन सुविधा मिळण्यास अपिलीय न्यायाधिकरणाचे अध्यक्ष हक्कदार असतील. परंतू विवक्षीत प्रकरणी स्वत:च्या मालकीचे वाहनाचा वापर केल्यास प्रचलित नियमानुसार अनुज्ञेय रक्कम मिळण्यास पात्र ठरतील.

४) <u>अवशिष्ट तरतूदी:-</u>

अध्यक्ष, महाराष्ट्र स्थावर संपदा अपिल न्यायाधिकरण यांच्या सेवाशर्ती संबंधात या नियमांमध्ये कोणतेही स्पष्ट तरतूद करण्यात आली नसेल अशा प्रकरणी मा. उच्च न्यायालयाच्या न्यायाधिशांना अनुज्ञेय असतील त्या तरतूदी लागू ठरतील.

<u>सदस्य- महाराष्ट्र स्थावर संपदा अपिल न्यायाधिकरण -:</u>

केंद्रीय स्थावर संपदा (विनियमन व विकास) अधिनियम, २०१६ तसेच दि. २०.०४.२०१७ रोजीच्या महाराष्ट्र स्थावर संपदा अपिल न्यायाधिकरण (अधिकारी व कर्मचारी) (नियुक्ती व सेवाशर्ती) नियम, २०१७ मधील तरतूदींनुसार अपिलीय न्यायाधिकरणाच्या सदस्यांचा दर्जा हा मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या दर्जाच्या समकक्ष आहे. सबब, सदस्य, महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरण यांना पुढीलप्रमाणे भत्ते/ सेवाशर्ती मंजूर करण्यात येत आहेत.

१) <u>वेतन व भत्ते -:</u>

अ) न्यायाधिकरणाचे सदस्य यांना मा .मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या मासिक वेतनाइतके मासिक वेतन देय असेल,

आ) न्यायाधिकरणाचे सदस्य यांना मा .मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांना अनुज्ञेय असतील त्या दराने महागाई भत्ता व शहर पूरक भत्ता देय असेल.

इ) त्याचप्रमाणे न्यायाधिकरणाचे सदस्य यांना मा .मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांना अनुज्ञेय असतील त्या दराने प्रवास भत्ता, दैनिक भत्ता तसेच इतर भत्ते असतील.

२) <u>निवास व्यवस्था:-</u>

मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांना अनुज्ञेय असेल, त्याच्या समकक्ष निवासस्थान अपिलीय न्यायाधिकरणाच्या सदस्यांस अनुज्ञेय असेल. विवक्षित प्रकरणी सदस्य स्वत:च्या मालकीच्या अथवा भाड्याचे निवासस्थानामध्ये वास्तव्य करीत असल्यास प्रचलीत नियमानुसार रकमेची प्रतिपूर्ती केली जाईल,

३) <u>वाहन सुविधा:-</u>

मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांना अनुज्ञेय असेल त्याप्रमाणे वाहन सुविधा मिळण्यास अपिलीय न्यायाधिकरणाचे सदस्य हक्कदार असतील. परंतू विवक्षीत प्रकरणी स्वत:च्या मालकीचे वाहनाचा वापर केल्यास प्रचलित नियमानुसार अनुज्ञेय रक्कम मिळण्यास पात्र ठरतील.

४) **<u>अवशिष्ट तरतूदी:-</u>**

सदस्य, महाराष्ट्र स्थावर संपदा अपिल न्यायाधिकरण यांच्या सेवाशर्ती संबंधात या नियमांमध्ये कोणतेही स्पष्ट तरतूद करण्यात आली नसेल अशा प्रकरणी मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांना अनुज्ञेय असतील त्या तरतूदी लागू ठरतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१३१६५१४४४४०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Suhas Madhav Mamdapurkar
Date: 2018.06.13 16:55:34 +05'30'

**( सुहास ममदापूरकर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा. सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. मा. अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, मुंबई.
५. सर्व मा. विधानसभा सदस्य/मा. विधानपरिषद सदस्य.
६. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल मुंबई.(पत्राने)
७. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई-३२.
८. मा. न्यायमूर्ती, श्री. एस.एस. केमकर, मा.उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
९. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
१०.मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
११.प्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने).
१२.मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण) ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
१३.अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण विभाग) मंत्रालय, मुंबई-३२.
१४.प्रधान सचिव (नगर विकास विभाग) मंत्रालय, मुंबई-३२.
१५.अपर मुख्य सचिव (महसूल व वन विभाग) महसूल व वन विभाग मंत्रालय, मुंबई-३२.

१६.अध्यक्ष/ (सदस्य- न्यायिक) (सदस्य- तांत्रिक/ प्रशासकीय) स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरण, मुंबई

१७.अतिरिक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग यांना त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयाच्या निदर्शनास आणण्याच्या विनंतीसह.

१८.उप सचिव, गृहनिर्माण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

१९.सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

२०.अध्यक्ष, स्थावर संपदा नियामक प्राधिकरण, मुंबई.

२१.सर्व विभागीय आयुक्त,

२२.सर्व जिल्हाधिकारी

२३.उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.

२४. मुख्य अधिकारी, झोपडपट्टी पुनर्विकास प्राधिकरण, मुंबई.

२५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय मुंबई-३२.

२६. महासंचालक, यशदा व राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.

२७. निवड नस्ती (दुवपु-२). गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.